# आता वंदू कवीश्वर भाग २

(मराठी काव्याच्या २००० वर्षांच्या प्रवासाचा आढावा)

रत्नाकर महाजन

विलेपार्ले, मुंबई

ramahajanp@yahoo.com

ph. 8879011951

# मनोगत -

मी आपल्यासारखाच एक काव्यरसिक .कवितांचे संग्रह जमा करणे हा माझा छंद . माझ्या घरीमाझा स्वत चा असा एक कवितांच्या पुस्तकांचा:मोठा संग्रह आहे . त्यांचा उपयोग करून कवींची आणि .त्यात असलेल्या प्रस्तावना आता दुर्मिळ आहेत त्यांच्या कवितांची ओळख करून द्यावी या हेतूने मी हे पुस्तक लिहायचा निश्चय .केला

हे करीत असताना, पहिला कवी कोण असा विचार मनात आलासंत ., पंत आणि तंत यांचा मागोवा घेत (शाहिरी काव्य), थेट मराठीतला पहिला काव्य संग्रह गाथासप्तशती जो इसवी सनाच्या पहिल्या शतकात रचला गेला, इथपर्यंत मागे गेलोमानवी जीवनातील शाश्वत मूल्यांचा पुरस्कार करणारा हा आद्य मराठीतील . .श्रेष्ठ ग्रंथ होय

माझ्या निवृत्तीच्या काळात मिळालेल्या वेळेचा उपयोग करून इंटरनेट प्रमाणेच इतर पुस्तके यातून माहिती जमवली आहे.

प्राचीन कवी मुकुंदराज ते नरेंद्र, संतकवी सावता माळी ते नामदेव; ज्ञानेश्वर - तुकाराम - एकनाथ, रामदास, पंतकवी मुक्तेश्वर ते मोरोपंत, शाहीर अनंत फंदी ते पठ्ठे बापुराव, अर्वाचीन कवी नव्या युगाचे प्रवर्तक केशवसुत; रविकिरण मंडळ; बापट-पाडगावकर-विंदा, आधुनिक नव काव्याचे प्रवर्तक बामर्ढेकरांपर्यंत अनेक . सी . .कवींच्या काव्याची झलक येथे वाचायला मिळेल

कवीची खरी ओळख ही त्याच्या काव्यातूनच होतेत्यामुळे कवींची माहिती दे .ताना त्यांची जात, त्यांना सहन करावे लागलेले अत्याचार, त्यांनी केलेले चमत्कार, त्यांच्या विषयीच्या आख्यायिक, दंतकथा टाळल्या आहेत.त्या नेटवर उपलब्ध आहेतच .

आचार्य अत्रेंनी एके ठिकाणी लिहिले आहे की 'ज्ञानेश्वरांनी भिंत चालवली किंवा रेड्याच्या मुखातून वेद वदवले याहीपेक्षा त्यांचा मोठा चमत्कार म्हणजे वयाच्या २०-

व्या वर्षी ज्ञानेश्वरीसारखा एक अद्भुत ग्रंथ रचला आहे आणि तो आपल्यासमोर २१ आहे' हा केवढा मोठा चमत्कार आहे.

माझी भूमिका या महान साहित्यरूपी सागराच्या तळाशी जाऊन, उत्तमोत्तम मोती शोधून आणून वाचकांच्या ओंजळीत द्यायचेत्यामुळे मी संग्रहक ., संकलक आणि संपादक अशा भूमिकेतून काम केले आहे.

माझ्यासारख्याच काव्य रसिकांना हे पुस्तक वाचून अधिक जाणून घ्यायची इच्छा व्हावी हीच माफक अपेक्षा.

आपल्या प्रतिक्रिया जाणून घ्यायला आवडेल.

फोडिले भांडार"

धन्याचा हा माल

मी तव हमाल

भारवाही".

संकलक, संपादक रत्नाकर महाजन

----------------------------------

# श्री. रत्नाकर महाजन



श्री रत्नाकर महाजन हे वयाची ऐंशी ओलांडलेले एक तरुण लेखक. एअर इंडियातून निवृत्तीनंतर त्यांच्या साहित्यिक प्रतिभा विशेषत्त्वाने प्रफ़ुल्लीत झाल्या. त्यांनी भारतीय हवाई वाहतुकीवर तीन खंडांचे एक पुस्तक लिहीले. त्यानंतर ई साहित्य प्रतिष्ठानसाठी पंख १ आणि पंख २ ही जागतिक हवाई वाहतुकीच्या इतिहासाची तोंडओळख करून देणारी दोन ई पुस्तके त्यांनी लिहीली. याच काळात ओरिगॅमी या विषयाचा सखोल अभ्यास करून त्यांनी अनेक ठिकाणी प्रात्यक्षिकांसह भाषणे केली. लोकांच्या आग्रहानुसार त्यांनी ओरिगॅमी या विषयावरही एक पुस्तक लिहीले जे ज्योत्स्ना प्रकाशन यांनी प्रकाशित केले. आपल्या अभ्यासाच्या कक्षा रुंदावत त्यांनी हिंदू धर्मग्रंथांचा मुळापासून अभ्यास करायला घेतला व त्यावरही “धर्मग्रंथ” नांवाचे एक सुंदर वाचनीय पुस्तक लिहून ई साहित्यच्या वाचकांसाठी विनामूल्य दिले.

या सोबत संगीत आणि वाचन यांद्वारे ते सतत नवीन नवीन काही शिकत असतात व त्यावर स्फ़ुट लेखन करणे हा त्यांचा छंद आहे.

अफ़ाट आणि वैविध्यपूर्ण वाचन आणि साक्षेपी लेखन करून ते ई साहित्यच्या वाचकांना विनामूल्य देतात. तरुणांना लाजवील असा त्यांचा उत्साह कायम वृद्धींगत राहून त्यांना उदंड अयुष्य आणि उत्तम आरोग्य लाभो व त्यांचे कडून वाचकांची व मायमराठीची सेवा घडो हीच आमची शुभेच्छा!

टीम ई साहित्य

या दुसऱ्या भागात खालील कवींचा समावेश आहे -

१) केशवसुत: कृष्णाजी केशव दामले

२) रेव्हरंड नारायण वामन टिळक

३) 'विनायक' जनार्दन करंदीकर

४) गोविंदाग्रज : राम गणेश गडकरी

५) बालकवी –त्र्यंबक बापुजी ठोमरे

६) माधव जूलियन : माधव त्र्यंबक पटवर्धन

७) गिरीश : शंकर केशव कानेटकर

८) यशवंत : यशवंत दिनकर पेंढरकर

९) चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे

१०) माधवानुज - काशिनाथ हरी मोडक

११) 'बी' – नारायण मुरलीधर गुप्ते

१२) भास्कर रामचंद्र तांबे

१३) गोविंद : गोविंद त्र्यंबक दरेकर

१४) दत्त - दत्तात्रय कोंडो घाटे

१५) बहिणाबाई चौधरी

१६) स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर

१७) केशवकुमार : प्रल्हाद केशव अत्रे

१८) अनिल : आत्माराम रावजी देशपांडे

१९) अनंत (आत्माराम) काणेकर

२०) सोपानदेव चौधरी

# प्राचीन काव्य - कवी संत :

ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादी संत कवींनी विविध प्रकारची काव्यरचना केली. त्यांनी केवळ तत्त्वज्ञानावर ग्रंथ रचले नाहीत तर हरिकथानिरुपण केले; तसेच वैयक्तिक भावना व्यक्त करणारे अभंगही रचले. या सर्व काय रचनेत त्यांचा हेतू परमार्थसाधन हाच होता. स्वत: परमार्थाचा मार्ग शोधीत तो इतरानाही दाखवावा यासाठी त्यांनी काव्य रचना केली.

देवादिकांची चरित्रे  सांगून आणि साधुपुरुषांच्या जीवनकथा गाऊन ते संसाराचा फोलपणा आणि मानवी जीवनाची नश्वरता काव्यातून वारंवार सांगत. जग हे सर्व माया आहे, हे सर्व नश्वर आहे. तेव्हा नश्वरातात न गुरफटतात ईश्वराची वाट धरावी हेच त्यांच्या उपदेशाचे सार आहे. त्यासाठी समजावयास सोपा असा काव्यरचनाप्रकार म्हणजे ओवी आणि अभंग; त्याचाच त्यांनी सर्रास उपयोग केला.

## पंडित कवी –

वामन पंडित आणि मोरोपंत हे या युगाचे अध्वर्यू होत. पुराणातील कथांचे रसाळ अनुवाद करण्याच्या कामी त्यांनी आपली काव्यशक्ती प्रगट केली. हरिगुणगान हाच त्यांच्याही काव्यरचनेचा प्रधान हेतू होता.

## शाहिरांची कामगिरी -

महाराष्ट्रात स्वराज्याचा सूर्योदय झाल्यावर सर्व समाजात नव्या चैतन्याची जाणीव झाली. वीरांच्या पराक्रमाने सर्वांची अंत:करणे उचंबळून येत होती. अशा वातावरणात शाहीर जन्माला आले. शाहिरांनी पोवाडे रचले, लावण्याही रचल्या. वेदांतपर उपदेश करणारी कवनेही काहींनी रचली. त्यांचे मुख्य कार्य म्हणजे पराक्रमाचे वैभव उपभोगणाऱ्या समाजाचे मनोरंजन करणे.

## स्वतंत्र काव्यरचनेस प्रारंभ -

परकीय भाषांतील काव्यांची मराठीत भाषांतरे झाली तरी मूळ काव्यातील विदेशी वातावरण मराठीतही विदेशीच राहिले होते. आपल्या काव्यात आपल्या संस्कृतीचे प्रतिबिंब वठले पाहिजे, अशी जाणीव कवींमध्ये उत्पन्न झाली. आणि त्या दृष्टीने काव्यरचनेस आरंभ 'राजा शिवाजी' या काव्यापासून झाला. ते महादेव मोरेश्वर कुंटे यांनी १८७१ मध्ये लिहिले. कुंटे म्हणतात, "राष्ट्रांच्या प्रगतीला शास्त्राइतकीच काव्याचीही आवश्यकता आहे. काळाला अनुरूप असा नवीन कविवर्ग निर्माण झाला पाहिजे. खालचा आणि वरचा हे दोन वर्ग जवळ आणून राष्ट्र एकजीव केले पाहिजे. यानेच राष्ट्रहित साधेल. भाषा व्यवहारातील पाहिजे."

"केशवसुतांनंतर आधुनिक कवितेची धुरा वाहणारे गोविंदाग्रज, बालकवी, रे. टिळक, रेंदाळकर इत्यादी कविश्रेष्ठ १९२० च्या आसपास आपले जीवित कार्य संपवून गेले होते.

याच सुमारास रविकिरणमंडळ व तांबे यांचे काव्य वाजुगाजू लागले ते या नंतरच्या लगतच्या काळात. आधुनिक कवितेच्या दृष्टीने केशवसुतांची पहिली पिढी कल्पिली तर गोविंदाग्रज-बालकवी यांची गणना दुसऱ्या पिढीत होते. रविकिरण हे तिसऱ्या पिढीचे; तांबे हे वयाने ज्येष्ठ असले तरी त्यांचा परिचय महाराष्ट्राला रविकिरणमंडळाच्या काळातच झाल्याने तांबे यांचाही अंतर्भाव तिसऱ्या पिढीतच करावा लागतो. बोरकर, कुसुमाग्रज, इंदिरा संत, संजीवनी मराठे वगैरे कवी-कवयित्रींचा समावेश चौथ्या पिढीत होतो.

आधुनिक कवीपंचक -

केशवसुत, टिळक, विनायक, गोविंदाग्रज आणि बालकवी यांचा आधुनिक कवीपंचक म्हणून उल्लेख करण्यात येतो. या पाच कवींनी आधुनिक काव्याचा प्रवाह सुरु करून त्यास निश्चित वळण लावले.

## १) केशवसुत: कृष्णाजी केशव दामले (१८६६-१९०५)




त्यांच्या मृत्युनंतर बारा वर्षांनी (१९१७ मध्ये) हरी नारायण आपटे यांनी त्यांच्या कवितांचा संग्रह प्रसिद्ध केला. त्यानंतर त्यांच्या काव्यातील वैशिष्ट्ये टीकाकारांच्या लक्षात आली आणि या कवीने काव्यात नवे युग सुरु केले आहे असा अभिप्राय कवीच्या मृत्यूनंतर १२ वर्षांनी व्यक्त होऊ लागला.

केशवसुतांना शेले, बायरन, वर्डस्वर्थ, ब्राउनिंग, टेनिसन इत्यादी इंग्रज कवींच्या आणि पो, इमर्सन, लॉंगफेलो आणि वॉल्ट व्हिटमन या अमेरिकन कवींच्या काव्यास्वादाने एक नवी दृष्टी मिळाली यात शंका नाही.

या नव्या युगांच्या जाणिवांचा पहिला हुंकार केशवसुतांच्या कवितातून आविष्कृत झाला. म्हणून ते आधुनिक मराठी कवितेचे युगप्रवर्तक नेते. केशवसुतांनी मराठी कवितेला अंतर्मुख  केले.

" केशवसुतपूर्व कविता पौराणिक आख्यानांचा प्रपंच भक्तिभावाने मांडीत होती. कवीचे वैयक्तिक जीवन आणि त्याला येणारे विविध अनुभव हे काव्यविषय होऊ शकत नव्हते. काव्याने दोन टोके गाठली होती. एक देवादिकांच्या कथांभोवती घोटाळणारे भक्तिभावाचे आणि दुसरे पेशवाईच्या अंत काली बोकाळलेल्या विलासी स्वच्छंद लावणीचे. कविता देवळाच्या गाभाऱ्यातून जी बाहेर पडली ती शाहिरांच्या संगतीत नर्तकी बनून नृत्यशाळेत जाऊन खाडी झाली.

इंग्रजी वाङ्मयाच्या परिचयाने तिचा संपूर्ण कायापालट घडला आणि ती माता, भगिनी, पत्नी, कन्या या कुलस्त्रीच्या चतुर्विध स्वरूपात रसिकांच्या दृष्टीस पडू लागली. इंग्रजी वाग्मायाच्या परिशीलनाने मराठी कवितेचे अंतरंगही आमुलाग्र बदलून गेले. बहिरंग आणि अंतरंग यातला हा बदल केशवसुतांच्या काव्यरचनेत पराकोटीला पोचलेला दिसतो, म्हणून त्यांना नव्या युगाचे जनक म्हणायचे.

'देव दानवा नरे निर्मिले, हे मत लोका कवळू द्या' या त्यांच्या काव्यपंक्तीत त्यांचा महान क्रांतिकारक दृष्टीकोन स्पष्ट होतो. ' ती माझी मी त्यांचा - एकच ओघ आम्हातुनी वाहे' अशी त्याची भावना होती.

" गंगौहापरि भव्य, केशवसुता, सावेश वाणी तुझी "

१) तुतारी -

एक तुतारी द्या मज आणुनी
फुंकीन मी जी स्वप्राणाने
भेदुनी टाकीन सगळी गगने
दीर्घ जिच्या त्या किंकाळीने;
अशी तुतारी द्या मज लागुनि

२) झपूर्झा ! -

हर्षखेद ते मावळले
हास्य निमाले
अश्रु पळाले;
कंटकशल्ये बोथटली
मखमालीची लव वठली;
काही न दिसे दृष्टीला
प्रकाश गेला
तिमिर हरपला;
काय म्हणावे या स्थितीला ?
झपूर्झा ! गडे झपूर्झा !

३) स्फूर्ती -

काठोकाठ भरू द्या पेला, फेस भराभर उसळू द्या !
प्राशन करिता रंग जगाचे क्षणोक्षणी ते बदलू द्या !
अमुच्या भाळी कटकट लिहिली सदैव वटवट करण्याची

म्हणेल जग आम्हास मद्यपी, पर्वा कसली मग याची !

४) नवा शिपाई -

नव्या मनूतील नव्या दमाचा शूर शिपाई आहे
कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे !
ब्राह्मण नाही, हिंदूही नाही, न मी एक पंथाचा,
तेच पतित की जे आखडिती प्रदेश साकल्याचा !

५) आम्ही कोण ? -

आम्ही कोण म्हणुनि काय पुसशी ? आम्ही असू लाडके
देवाचे, दिधले असे जग तये आम्हास खेळावया
विश्वी या प्रतिभाबले विचरतो चोहीकडे लीलया
दिक्कालातुनि आरपार अमुची दृष्टी पाहाय शके !

## २) रेव्हरंड नारायण वामन टिळक (१८६५-१९१९)



"तिसाव्या वर्षी या नाशिकच्या ब्राह्मणाने ख्रिस्तधर्म स्वीकारला, तेव्हा काय कल्लोळ उडाला असेल याची कल्पना करता येईल; त्याला तोंड दिले व 'मराठीपण' कायम ठेवण्याच्या आग्रहामुळे रुष्ट झालेल्या मिशनमधील वारीष्ठांशीही सामना दिला. टिळक ख्रिस्ती झाले ते रोजगाराच्या लोभाने नाही तर प्रचलित हिंदु समाजरचनेत न लाभणारी आंतरिक शांती तेथे लाभेल या आशेने. ती लाभली असावी असे त्यांच्या भक्तीकाव्यावरून वाटते.

धर्मांतरामुळे सामाजिक संबंधात त्यांची, अस्पृश्य म्हणून, ओढाताण झालीच असेल; पण साहित्यक्षेत्रातही त्याची सावली त्यांना सुटली असे नाही. बाप्तिस्मा घेताच ते मराठी परंपरेला पारखे झाले ही ओरड चुकीची आहे. उलट, ती परंपरा त्यांनी इतक्या कसोशीने राखली ही त्यांची कर्तबगारी ! "धर्मांतर म्हणजे देशांतर नव्हे" असे ते नेहमी म्हणत.

" 'फुलामुलांचे कवी' हे टिळकांचे वर्णन अनेक वर्षे चालत आलेले आहे. फुलांविषयीच्या टिळकांच्या कविता विशेष लोकप्रिय झाल्या; पण त्यातही बोधपरतेकडे स्पष्ट कल आहे."

टिळक म्हणतात "काव्य म्हणजे व्याकरण नव्हे; शुद्धलेखन नव्हे; काव्य म्हणजे काव्य ! वस्त्राभरणे म्हणजे सौंदर्य नव्हे. आधी सौंदर्य, मग ही उपकरणे." त्यांनी छंदशास्त्राशी खेळ केले नाहीत. काही सोपी वृत्ते, मनात बसलेल्या चार उडत्या चाली आणि अभंग इतकाच त्यांचा छंदांचा प्रपंच.

१) केवढे हे क्रौर्य !

क्षणोक्षणि पडे, उठे परि बळे, उडे बापडी,
चुके पथहि येउनी स्तिमित दृष्टीला झापडी;

किती घळघळा गळे रुधिर कोमलांगातुनी,
तशीच निजकोटरा परत पातली पक्षिणी.

म्हणे निजशिशूंप्रती 'अधिक बोलवेना मला,
तुम्हास अजि अंतिचा कवळ एक मी आणिला;
करा मधुर हा ! चला ! भरविते तुम्हा एकदा
करो जतन यापुढे प्रभु पिता अनाथा सदा !

म्हणाल भुलली जगा, विसरली प्रिया लेकरा,
म्हणून अतिसंकटे उडत पातले मी घरा ;
नसे लवहि उष्णता, नच कुशीत माझ्या शिरा,
स्मरा मज बरोबरी परि दयाघना ईश्वरा !'

मातीत ते पसरले अतिरम्य पंख
केले वरी उदर पांडुर निष्कलंक !
चंचू तशी उघडी, पद लांबविले,
निष्प्राण देह पडला, श्रमही निमाले !

२) पाखरा ! येशील का परतून ?
मत्प्रेमाने दिल्या खुणातून
एक तरी अठवून ? पाखरा !

## ३) 'विनायक' जनार्दन करंदीकर (१८७२-१९०९)

" विनायकांच्या कवितेइतकीच त्यांच्या रंगेलपणाची चर्चा झाली आहे; फक्त ती जरा दबल्या सुरात होते इतकेच. कविपेक्षा त्यांच्या कवितेचे आयुष्य जास्त असते हेच समाधान."

"या दुरंगीपणात ढोंग नाही, कारुण्य आहे. जडलेल्या छंदांचे पाश इच्छा असून तोडता येत नाहीत या अगतिकतेच्या जाणीवेने उत्पन्न झालेली विव्हलता 'प्रत -' या स्वपत्नीस उद्देशून लिहिलेल्या कवितेत पाहावी. "दुर्दैवे जडले मला व्यसन जे, ते साहवेना तुला ?" पण जन्माचा संबंध जोडला तो "घ्यावा गोड करून ह्यातच भले हे का कळेना तुला ?" असा कळवळून प्रश्न विचारला आहे. त्या कालचे रुक्ष, सहानुभूतिशून्य गृहजीवन आणि निसर्गस्फुर्त रक्तातील रंगेलपणा यातील ओढाताणीने दुखावलेल्या दिलदार माणसाची ही कहाणी वाटते."

१) "महाराष्ट्र-लक्ष्मी माते जागी धन्य वाटे,
यशोगीत तीचे गाता मनी हर्षदाटे.
पूर्व दिव्य ज्यांचे,त्यांना रम्य भाविकाळ ,
बोध हाच इतिहासाचा सदा सर्वकाळ,
कासया वहावी चिंता मनी मग जहाल,
रात्र सरे तेव्हा उगवे दिनहि पूर्ववाटे".

२) हतभागिनी -

तळहाती टेकुनी ही स्वशिराते बैसली !
मस्तकी केश विखुरले,
श्वास चालले, अश्रू लोटले,
गळे जल गाली - चिंतेने पोळली !
कल्याण काय नेणती,
नित्य भांडती, आपसात ती,
परां वश झाली - स्वत्वाला विसरली !
गेले दिन यावे कसे,

वर्तन असे, एकदा फसे __
गाय जी गाळी _चेपत ती चालली !"

## ४) गोविंदाग्रज : राम गणेश गडकरी (१८८५-१९१९)




" आधुनिक कविता साधारण वाचकापर्यंत नेण्याचे कार्य गोविंदाग्रजांनी केले. त्यांना अजोड लोकप्रियता लाभली. पद्याप्रमाने गद्यातही त्यांच्या अनुकरणाची साथ पाहता पाहता फैलावली.

'बाळकराम' म्हणून महाराष्ट्राला त्यांच्या चमकदार विनोदाचा परिचय आहेच. याशिवाय त्यांच्या नाटकात विनोदाने हजारो प्रेक्षकांना स्तिमित केले आहे. त्यांच्या काव्यातही ही विनोदबुद्धी डोकावते.पण हा बेडर विनोदी लेखक रात्रीबेरात्री एकट्याने बाहेर पडावयास भीत असे आणि सामाजिक रूढींवर उपहासाचे शस्त्र तिखटपणे चालविणारा हा सुधारक अतिशय देवभोळा होता. पण अशा विसंगतीने त्यांच्या चित्राला अधिक रंगत येते आणि त्यातील माणुसकीही उठून दिसते. ' अनामिकाच्या अभंगात' देवभोळेपणाची ओळख पटेल; तर भित्रेपणाचे उरफाटे रूप घुबड आणि स्मशान यांच्या भेसूर गाण्यातील रौद्र-बीभत्स वर्णनात सापडेल !"

"भाषेच्या नादी लागलेला हा कवी मधुर शब्दपंक्ति आणि धुंद ओळी इतक्या मुलायमपणे लिहून जातो की रसिकां चे क्षणभर भान हरपावे.

'प्रेमाचे शाहीर' ही गोविंदाग्रजांची आणखी एक पदवी प्रख्यात आहे. त्यांच्या प्रेमविषयक कवितांनी त्या वेळी तरुण महाराष्ट्रावर मोठीच मोहिनी घातली होती. त्यांची प्रेमभंगांची गीते वाचल्यावर ती केवळ कल्पनेचा खेळ नसावीत असे वाटते. त्यांतून निघालेली निराशा अनेक कवितांवर पसरली आहे. पण नैराश्यातही तरुण मनाला कसलीतरी गोडी वाटत असते ! म्हणून या कवितांबद्दल अनेकांना वाटणारी ओढ ! 'प्रेम आणि मरण' या कवितेच्या उत्कृष्टपणाचा उल्लेख वर आलाच आहे.

" तो योग, प्रीतीचा रोग,

खरा हटयोग लागला

ज्याला हे असे, लाभले मरणही त्याला."

'कृष्णाकाठी कुंडल' या अपूर्ण राहिलेल्या ऐतिहासिक कथन-काव्यावरून त्या दिशेने गोविंदाग्रजांनी फार मजल मारली असती असा अंदाज बांधता येईल.

गोविंदाग्रजांची कल्पनाशक्ती क्वचित अमूर्ताचा शोध घेऊ लागली तरी ती मुर्ताच्या आधारानेच. त्यांच्या कवितेत सुंदर शब्दचित्रांची पखरण आहे. कधी आतील मानसिक प्रतिमा रेखीव नसली तरी शब्दांनी थरारलेला आपल्या कल्पनेने ती जाणून घेतो. केवळ शैलीने साध्यासुध्या वाचकातीलही कवी जागृत काणारी ही किविता आहे."

अनामिकाचे अभंग –

१) कवित्वाचा येथे वाहिला मीपणा | लक्ष्मीनारायणा तुझे पायी ||

गणांमात्रांचा तो नको ताळेबंद | नको वृत्त छंद नाम गाया ||

विनाकानामात्रा आणिक वेलांटी | लेखन कामाठी मांडिली हे ||

साहित्याची कळा झाली तिऱ्हाईत | शुद्धाशुद्धातीत नाम तुझे ||

म्हणे "XX" जे जे मनी मुखी आले | ते ते येथ झाले ब्रह्मार्पण ||

२) नेघे देवा तुझा नावा | तुझामाझा उभा दावा ||

नामे उद्धरिले सारे | मीच एक राहीन बा रे ||

तुझ्या नावा गालबोट | सुखे खावे दातओठ ||

पाहू बोलाविल्यावीण | हरी का ते माझा शीण ||

देवा तुझी घ्याया लाज | "XX" ठाकलासे आज ||

३) काय महिमा नामांकित | आज दाखवा प्रचीत ||

पूर्वी नाव झाले फार । नको त्याचा बडिवार ॥

दावि मज प्रत्यय काही । नको संतांची ती ग्वाही ॥

देणेघेणे हातोहात । उधारीची नाही बात ॥

धन्य "XX" भाग्यवंत । देवा तुझा पाही अंत ॥

४) राजहंस माझा निजला !

(पतिनिधनानंतर अल्पावधीतच बापडीवर एकुलत्या एका मुलाचे निधन पाहण्याचा प्रसंग आल्यावर असा भ्रम का होणार नाही ?)

हे कोण बोलले बोला ? 'राजहंस माझा निजला !'

दुदैव नगाच्या शिखरी | नवविधवा दु:खी आई |

ते हृदय कसे आईचे | मी उगाच सांगत नाही |

जे आनंदेही रडते | दु:खात कसे ते होई ___

हे कुणी कुणा सांगावे !

आईच्या बाळा ठावे !

प्रेमाच्या गावा जावे __

मग ऐकावे या बोला | 'राजहंस माझा निजला !'

५) फुल ना फुलाची पाकळी -

खुनी खड्यांनी भरले रांजण वाल्ह्याचे फुटले सारे |
उरले रामायण ते नटवी श्रीरामा निज आधारे ||

गोकुळातल्या चोराचा नच गोपींना आता त्रास |
श्रीकृष्णाची गीता उरली द्याया मरत्या उल्हास ||

काटे सुकले फांदीवरती - धन त्यांची झाली राना |
गुलाब देवा, तुम्हा वाहिला, गोड करुनी तो का घ्याना ||

दूषण वगळूनि भूषणमात्रे प्रभूपूजन करि काळ असे |
तुम्ही आम्ही कष्टी होणे हा कुठला मग न्याय असे ?||

६) 'माझा मृत्यूलेख' -

यावज्जीवहि 'काय मी' न कळले आत्पांप्रती नीटसे
मित्रातेहि कळे न गूढ- न कळे माझे मलाही तसे
अज्ञाता ! मरणोत्तर प्रकट ते होईल तुते कसे ?

कोठे आणि कधी तरी जगति मी होऊनी गेलो असे

( An April Fool's  Work - १-४-१९१८)

७) एखाद्याचे नशीब -

काही गोड फुले सदा विहरती स्वर्गांगनांच्या शिरी,
काही ठेवितसे कुणी रसिकही स्वच्छंद हृन्मंदिरी
काही जाउनी बैसती प्रभुपदी पापापदा वारि ते,
एखादे फुटके नशीब म्हणुनी प्रेतास शृंगारिते !

८) महाराष्ट्रगीत -

मंगल देशा ! पवित्र देशा ! महाराष्ट्र देशा |
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्र देशा ||
राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा |
नाजूक देशा, कोमल देशा, फुलांच्याही देशा ||
अंजनकांचनकरवंदीच्या काटेरी देशा |
भावभक्तीच्या देशा आणिक बुद्धीच्या देशा ||
शाहिरांच्या देशा, कर्त्या मर्दांच्या देशा
ध्येय जे तुझ्या अंतरी - निशाणावरी - नाचते करी |
जोडी इहपरलोकासी - व्यवहारा परमार्थासी - वैभवासि वैराग्यासी |
जरिपटक्यासह भगव्या झेंड्याच्या एकचि देशा |
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्र देशा ||

## ५) बालकवी –त्र्यंबक बापुजी ठोमरे (१८९०-१९१८)



" सौंदर्याची द्वाही फिरविण्या बा तव अवतार " - गोविंदाग्रज

" लक्ष्मीबाई टिळकांच्या स्मृतिचित्रात बालकवींचे चटका लावणारे चित्र आहे.

' ठोमरे बालकवी होता; पण कवीपेक्षाही तो बाल अधिक होता " या लक्ष्मीबाईंच्या शब्दात बालकवींच्या आयुष्याचे आणि काव्याचेही सार आले. दारिद्र्य, शिक्षणाची आबाळ, अस्थिरता, हाच पाढा या कवीबाबतही खरा आहे. पण टिळकांनी त्याला मुलासारखा वाढवला आणि त्यांच्या घरी तो मुलासारखा हसला खिदळला; स्वत:चे घर असे फारसे नव्हतेच.

"सुखदु:खांच्या व्योमाहाच्या, 'सुटला फेऱ्यांतुनी'

नसे जग याच्या ध्यानी मनी "

"सुखदु:खांच्या व्योमाहाच्या, 'सुटला फेऱ्यांतुनी'

नसे जग याच्या ध्यानी मनी "

आणि हा मुशाफिर एके दिवशी आपल्याच तंद्रीत चालत असता आगगाडीखाली सापडून मरण पावला. या वार्तेने टिळक कुटुंब हादरले आणि गडकऱ्यांना काही दिवस वेड्यासारखे झाले. ती "क्षीण हसतमुख मूर्ति" पुन्हा दिसणार नाही या विचाराने अनेक स्नेह्यांनी अश्रू गाळले. या कवीतील गोडवा असा की ज्याला त्याला तो हवासा वाटे. तोच गोडवा त्याच्या कवितेत भरून राहिला आहे. प्रल्हाद केशव अत्र्यांनी लहानपणी बालकवींच्या कपट्यावर खरडलेल्या कविता वाचून आपणास कसे धुंद वाटत असे याचे वर्णन केले आहे. झरझर कविता लिहायची, कोणी मनापासून ऐकली नाही तर कागद चुरगाळून फेकून द्यायचा असा त्यांचा खाक्या. आज त्यांच्या पुऱ्या दीडशे कविताही उपलब्ध नाहीत. किती चुरगळून गेल्या असतील याची कल्पना करीत विषाद मानावयाचा ! 'एका उन्मनस्काला पाहून' या कवितेत टिळकांनी

बालकवींच्या काव्यसमाधीचे चित्र काढले आहे. ती समाधि उतरल्यावर हा मुलांबरोबर खेळायला मोकळा ! "पहिल्या व दुसऱ्या निर्झरांपैकी कोणता चांगल हे मलाच कळत नाही" असे बालकवी म्हणत. असा काहीसा बालसुलभ सरळपणा त्यांच्यात शेवटपर्यंत होता. कसलाच निबरपणा त्यांच्यात आला नाही. त्यांच्या शैलीचे नाजूक सौंदर्य अगदी सहजस्फुर्त आहे. हा तिचा मोठा गुण. त्यांनी लिहावे ते सुंदर व्हावे असे त्यांना सौंदर्याचे देणे होते.

बालकवींना वेड होते ते सौंदर्याचे.

"सुंदरतेच्या सुमनावरचे दव चुंबुनि घ्यावे
चैतन्याच्या गोड कोवळ्या उन्हात हिंडावे
प्रीतिसारिका गीत तिचे ऐकावे कानी
बनवावे मन धुंद रंगुनी काव्यसुधापानी "

ही त्यांची लालसा. पण पूर्ण सौंदर्य आणि आपण यांच्या आड या जड देहाची आवरणे येतात. "अंधाराचे पाश मनाचे हे गळुनी जावे" याची त्यांना तळमळ लागते. वयाबरोबर ही तळमळ वाढली. पहिल्या उत्साहात ' इकडे तिकडे चोहिकडे केवळ आनंद दिसत होता; इतके सौंदर्य भोवताली विखुरले आहे तरी "स्वार्थाच्या बाजारात" अडकलेला माणूस ते पाहात नाही आणि ते दु:ख करीत बसतो. लडिवाळपणे कवी त्यांना ते सौंदर्य उकळून दाखवतो. पण हळूहळू हा उल्हास मावळला आणि

"काय बोचते ते समजेना
हृदयाच्या अन्तर्हृदयाला"

अशी अवस्था येऊ लागली.

"जीव ओढतो वरवर जाया चैतन्यापाठी
हाय ! सुटेना दृढ देहाच्या परि बसल्या गांठी"

संसाराच्या पहिल्या तापानेच करपून जाऊ लागलेला हा बालकवी त्यातून सुटण्याची धडपड करीत होता. मृत्यूची छाया मनात तरळत होती; तिची भीती वाटत होतीही आणि नव्हतीही.

"स्वप्नीहि स्वप्ने बघत
स्वप्नातच व्हावा अन्त"

कदाचित् मृत्युच्या पार वसलेल्या प्रदेशात त्या सौंदर्याचा माग लागेल ही आशा होती.

"रंगांचे आकर्षण हे बालकवींचे वैशिष्ट्य इतर फार थोड्या मराठी कवीत दिसते. 'औदंबर' सारखी छोटी कविता रंगछटांनी कशी न्हाऊन निघाली आहे ! रंग, नाद आणि रेखा यांची इतकी गोंडस संगती फुलविणारा कवी शतकात एखादाच निघायचा."

फुलराणी -

हिरवे हिरवे गार गालिचे - हरित तृणाच्या मखमालीचे
त्या सुंदर मखमालीवरती - फुलराणी ही खेळत होती
गोड निळया वातावरणात - अव्याज मने होती डोलत.
प्रणय चंचला त्या भ्रूलीला - अवगत नव्हत्या कुमारिकेला !
आईच्या मांडीवर बसुनी - झोके घ्यावे, गावी गाणी ;
याहुनि ठावे काय तियेला - साध्या फुलराणीला ? ..१.

गाऊ लागले मंगलपाठ - सृष्टीचे गाणारे भाट,
वाजवि सनई मारुतराणा - कोकिळ तानांवर ताना !
नाचू लागले भारद्वाज - वाजविती निर्झर पखवाज,
नवरदेव सोनेरी रविकर - नवरी ही फुलराणी सुंदर !
लग्न लागले ! सावध सारे ! - सावध पक्षी ! सावध सारे !
दंवमय हा अंत:पट फिटला - भेटे रविकर फुलराणीला ! ...८

श्रावणमास -

श्रावणमासी हर्ष मानसी हिरवळ दाटे चोहिकडे ;
क्षणात येते सरसर शिरवे, क्षणात फिरुनी ऊन पडे !
वरती बघता इंद्रधनूचा गोफ दुहेरी विणलासे
मंगल तोरण काय बांधिले नभोमंडपी कुणी भासे !
झालासा सूर्यास्त वाटतो, सांज अहाहा ! तो उघडे ;

तरुशिखरांवर, उंच घरांवर, पिवळे पिवळे उन पडे !
उठती वरती जलदांवरती अनंत संध्याराग पहा !
सर्व नभावर होय रेखिले सुंदरतेचे रूप महा !
बलाकमाला उडता भासे कल्पसुमांची माळचि ते,
उतरुनि येती अवनीवरती ग्रहगोलचि की एकमते !

बाल-विहग - (अष्टदिशांचा गोफ)

सांज खुले सोन्याहुनि पिवळे हे पडले ऊन
चोहिकडे लसलशीत बहरल्या हिरवाळी छान !
पांघरली जरतार जांभळी वनमाला शाल
सांध्यतेज गिरिशिखरी विखरी संमोहनजाल
त्या तेजाचा प्राण चिमुकला संध्येचा दूत
बाल विहग आनंद मूर्तिमान् झुलतो गगनात !

औदुंबर -

ऐल तटावर पैल तटावर हिरवाळी घेउन
निळा सावळा झरा वाहतो बेटाबेटातून
चार घरांचे गाव चिमुकले पैल टेकडीकडे;
शेतमळयांची दाट लागली हिरवी गरदी पुढे.

पायवाट पांढरी तयातून अडवी तिडवी पडे
हिरव्या कुरणामधुन चालली काळया डोहाकडे
झाकळुनी जळ गोड काळिमा पसरी लाटावर
पाय टाकुनी जळात बसला असला औदुंबर

तू तर चाफेकळी - (काही अपूर्ण गीतांमधील एक)

"गर्द सभोती रान साजणी, तू तर चाफेकळी !
काय हरवले सांग शोधिसी या यमुनेच्या जळी ?"
ती वनमाला म्हणे, "नृपाळा, हे तर माझे घर.
पाहत बसते मी तर येथे जललहरी सुंदर.
हरिणी माझी तिला आवडे फारच माझा गळा ;
मैना माझी गोड बोलते तिजला माझा लळा.
घेऊन हाती गोड तिला त्या कुरणावरती फिरे
भाऊ माझा, मंजुळवाणे गाणे न कधी विरे."

'हृदयाची गुंतागुंत' -

" हे ज्ञान मला तर अज्ञानापारि भासे
मी सोडविता ते उलटे बांधी फासे
मम विटले शब्दचिकित्सा सारी
मी फिरता गरगर बुद्धि तयामाझारी."

'निराशा' -

"सुंदर सगळे, मोहक सगळे
खिन्नपणा परि मनिचा न गळे
नुसती हुरहूर होय जीवाला - का न कळे काही !"

' आनंदी - आनंद ' -

"आनंदी आनंद गडे इकडे तिकडे चोहिकडे
वरती खाली मोद भरे वायूसंगे मोद फिरे;
नभात भरला, दिशात फिरला, जगात उरला
मोद विहरतो चोहिकडे आनंदी आनंद गडे !"

आधुनिक कवीपंचकातले शेवटचे कवी गोविंदाग्रज १९१९ साली दिवंगत झाले. त्यांच्या मृत्यूमुळे आधुनिक काव्यपरंपरा एकदम तुटल्यासारखी वाटावी इतका त्यांच्या काव्याचा प्रभाव होता. परंतु त्याच सुमारास काव्यक्षितिजावर नव्या कवीमंडळाचा उदय झाला तेच सुप्रसिद्ध रविकिरणमंडळ - स्थापना १९२३

चिन्ह :



पुण्यातले सातआठ कवी एकमेकांचा हात धरून भीत भीत एका ठिकाणी जमले आणि त्यांनी एका कोपऱ्यात एक लहानशी शेकोटी पेटवली. तिचे नाव ‘रविकिरण मंडळ.’ ही मंडळी दर रविवारी एकत्र जमत. आणि लिहिलेल्या कविता चहा पितां  पितां एकमेकांना वाचून दाखवत. आणि त्यावर चर्चा करीत. ‘रविकिरण मंडळा’चे स्वरूप अभिनव होते. काव्य निर्मितीसाठी स्थापन झालेली ती एक प्रकारची सहकारी पेढीच होती म्हणानात. ‘रविकिरण मंडळा’त ही मंडळी सामील झाल्यापासून त्यांच्या पूर्वीच्या स्वरूपात एकदम फरक पडला. आणि त्यांच्यापैकी काहींची चेहेरेपट्टी तर अजिबात बदलून गेली. ही किमया त्यामधल्या केवळ एकाच माणसाने केली. त्याचे नाव प्रा. माधव पटवर्धन किंवा माधव जूलिअन्. हेच ‘रविकिरण मंडळा’तले खरे ‘रवि’ होते. बाकीची निदान त्यावेळी तरी किरणे होती. माधव जुलिअन् हे फर्ग्युसन कॉलेजात फार्शी भाषेचे प्राध्यापक म्हणून नुकतेच त्यावेळी नेमण्यात आलेले होते. फार्शी कवितेचा आणि फार्शी त्यांच्यावर त्यावेळी विलक्षण पगडा बसलेला होता. त्यामुळे कवितेच्या प्रांतात सामान्यपणे वावरणाऱ्या माणसापेक्षा त्यांच्यामध्ये एक वेगळेच व्यक्तिमत्व तयार झाले होते. त्यांच्या विचारात आणि भाषेत अनेक चमत्कारिक खोडी भरलेल्या होत्या. त्यांचा परिणाम ‘रविकिरण मंडळा’च्या सभासदांवर इतका झाला की त्यापैकी पुष्कळसे माधव जुलिअनच्या  दृष्टीकोनाने काव्याकडे पाहू लागले आणि जवळ जवळ त्यांच्याच वृत्तांत आणि भाषेत कविता लिहू लागले. ‘रविकिरण मंडळा’चा फार्शी फॅशन पंथ अतिशय विसंगत होता. गणपतीची आरती चालू असताना त्याच ठिकाणी ‘गॉड सेव्ह द किंग’ हे गाणे एखाद्याने सुरु

करावे म्हणजे भाविक मनाला कसे वाटेल? तसे मला वाटले ! विडंबन काव्य ही त्याच माझ्या दुखावलेल्या भावनेची वाङ्मयीन प्रतिक्रिया होती.

माधव जुलिअन् यांच्या काव्याचा आत्मा आणि पिंड इतका बदलत गेला की अखेर आरशात त्यांना आपला चेहरा ओळखता आला की नसता याची शंका आहे. त्यांच्या कवितेचे प्रारंभीचे स्वरूप इतके बेंगरूळ आणि धेडगुजरी होते की ते बघून आमच्यासारख्या शब्दसंगीताच्या आणि ध्वनिसौंदर्याच्या उपासकांना विलक्षण हादरा बसला. माधव जुलिअन् यांची वृत्ती आणि प्रतिभा बंडखोराची होती यात मुळीच संशय नाही. पण केशवसुतांना ज्या अर्थाने बंडखोर कवी म्हणता येईल, त्या अर्थाने माधव जुलिअन् ह्यांना काही बंडखोर म्हणता यायचे नाही. केशवसुतांचे बंड हे वैचारिक बंड होते. खरे बंड होते ते. माधव जुलिअनांचे बंड हे निव्वळ भाषेपुरते होते.

'वन्दे त्वमेकम् अल्लाहु अकबर' हा डोक्यावर पगडी आणि कमरेला लुंगी नेसलेल्या त्यांच्या त्यावेळच्या काव्याचा एकाच विक्षिप्त नमुना माझ्या म्हणण्याची सत्यता पटवून द्यावयास  पुरेसा आहे.     – आचार्य प्र. के. अत्रे

## ६) माधव जूलियन : माधव त्र्यंबक पटवर्धन (१८९४-१९३९)



माधव त्र्यंबक पटवर्धन (माधव जूलियन)
जन्म: २१।१।१८९४] [मृत्यु: २९।११।१९३९

'मराठी असे आमुची मायबोली' ही महाराष्ट्रात अत्यंत लोकप्रिय झालेली कविता आहे.

'कवी' या दृष्टीने त्यांच परिचय मराठी वाचकास होताच पण त्यांनी फार्सी भाषेचा रसिकपणे अभ्यास केला होता. तिच्यामधील वातावरणाचा पुष्कळच परिणाम मनावर झालेला असताना त्यांनी काव्य प्रांतात प्रवेश केला. परंतु त्यांनी फार्सी कवितांचा अनुवाद करण्यातच आपली लेखणी झिजवली नाही. त्यांच्या काव्य संग्रहात मराठी कविताच विपुल आहे. कारण फार्सी ही त्यांची परीक्षाविषयाची भाषा होती, तरी मराठी ही त्यांची मायबोली होती. फार्सी भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते, परंतु आपल्या मायबोलीविषयी त्याच्या अंत:करणात अथांग भक्ती होती. त्या भक्तीने त्यांनी मायबोलीची फार उच्च दर्जाची सेवा केली.

त्यांचा पहिला काव्यग्रंथ 'विरहतरंग' १९२६ साली प्रसिध्द झाला.

स्वत:च्या फार्सीच्या अध्ययनामुळे त्यांच्या काव्यात व लेखनात 'परकी' शब्द सहज येत असत. परंतु तो दोष आहे असे पटल्यावर त्यांनी आपल्या लेखनापासून शुद्धीकरणास सुरुवात केली. एकही परकी शब्द न आणता उत्तम मराठी लिहिण्यात आणि बोलण्यात त्यांनी यश संपादन केले.

सौंदर्याची ओढ ही केवळ शरीरोपभोगासाठी तडफडणारी वासना नसून जीवनातील एक शक्ती आहे हे त्यांनी आपल्या प्रणयगीतांत दाखविले. ते 'विरहतरंगा'च्या प्रस्तावनेत या संबंधी म्हणतात :

" सौंदर्य दर्शनापासून जिवाला विश्रांती आणि मनाची उन्नती झालीच पाहिजे. दुसऱ्याला उपसर्ग न पोचविता स्वत:चे जीवन सर्वांगसुंदर करण्याचा प्रत्येकाला जन्मसिद्ध हक्क आहे. म्हणून सौंदर्याचे अन्वेषण करून ते इतरांस प्रतीत करून देणे कवीचे एक कर्तव्य आहे."

१) तेथे चल राणी -

कोठे तरि जाऊ बसुनी शीघ्र विमानी - अज्ञात ठिकाणी.
स्वातंत्र्य जिथे, प्रेम इमानी - तेथे चल राणी !
सामाजिक संबंध सखे, हे न टिकाऊ; - हे स्नेह दिखाऊ !
मी तूज, मला तू, प्रभू दोघास निदानी.

२- फटकळ अभंग (

१. चालला असेल आज नामघोष - काय कंठशोष देवासाठी !
माणूसपुराचा राउळाला वेध, विठ्ठलाचा वेडा भक्तगण.
चंद्रभागेकाठी वालुकेचे कण, त्याहुनहि जन उदंड ते.
२. तुझ्या माहात्म्याचा आषाढीचा दिन, तथापि वंदिन दुरून मी.
या लोकांसारखा कसा हेऊ धाव ? मोक्षाची त्या हाव नाही मला.
कशी मागू देवा ! कैवल्याची भीक, हवी मोकळीक प्रपंचाची.
माझा एकट्याचा कशाला उद्धार ? राहिला संसार करोडांचा.
३. तुझे भक्तगण तुझे देवपण, घेती हिरावून पांडुरंगा.
तुला स्वतापरी मानूनि साचार, सारे सोपस्कार करिती ते.
चुकूनी ये तुझे नाम जिव्हेवर, पापाचे डोंगर भस्म होती.
तुझ्या नामाचा हा विचित्र महिमा, केवी न्यायसीमा ओलांडी रे ?

४. कटीवर हात ठेवूनि तिष्ठत, पुढे काय गत पांडुरंगा ?
भक्तांनी घातले तुला हे दागिने, पराक्रमाविणे टिकती न.
आपुलिया बळे राही न सदाचे, तुझे पाषाणाचे राऊळही
रहाया अभंग सुंदर ते ध्यान, हवे अधिष्ठान कशाचे रे ?

५. पुरे झाली देवा, आजवर शोभा, मार आता तोबा भक्तांना या.
युगे अठ्ठावीस परवश जिणे जणू मिरवणे प्रेतयात्रा.
कोणीही कोठुनि यावे झोडपावे, त्यास निष्ठाभावे सेवितोच !
एकमेकांवर खातो दातओठ, भरितो हे पोट उच्छिष्टाने.

## ७) गिरीश : शंकर केशव कानेटकर (१८९३-१९७३)



शंकर केशव कानेटकर ( गिरीश )
जन्म : २८ ऑक्टोबर १८९३

सामाजिक सुधारणेस अत्यावश्यक अशी विचारपरंपरा आणि तत्त्वज्ञान काव्यद्वारा प्रसृत करणे हे रविकिरणमंडळाच्या ध्येयांपैकी एक प्रमुख ध्येय होते. गिरीशांनी आपल्या काव्यातून याच ध्येयाची हेतुपुरस्सर जोपासना केली आहे. १९२८ साली त्यांची 'आम्बराई' प्रसिद्ध झाली. ग्रामीण जीवनावरील ते पहिले खंडकाव्य आहे. त्या खंडकाव्यात त्यांनी आपल्या रसवंतीचे भरास आलेले सौंदर्य प्रगत केले. त्यानंतर 'कांचनगंगा', 'फलभार' आणि 'मानसमेघ' या स्फुट कवितासंग्रहात त्यांच्या भावगीतांचे सौंदर्य व्यक्त झाले आहे.

'काव्यशिल्पी' असे त्यांचे वर्णन केले आहे. नागर जीवनाइतकीच ग्रामीण जीवनाविषयीही त्यांना आपुलकी असल्याने त्यांनी विशेषत: महाराष्ट्रातील शेतकऱ्यांच्या नि कामकरांच्या जीवनातील विविध प्रसंग वेळोवेळी रंगविले आहेत. १९३९ साली त्यांनी हिंदुस्तानची सफर केली. त्या प्रवासात रसिकपणे पाहिलेली हिमालयातील स्वर्गतुल्य आनंद देणारी अविस्मरणीय दृश्ये , 'मानसमेघ' या कवितासंग्रहात काव्यरुपाने रसिकांपुढे प्रगट झाली आहेत.

१) 'संसारवन' -

काटेकुटे रानी, किती या माजले फुलांचे साजले वृक्ष परी
दगडधोंड्याला, पाय ठेचाळती हिरवळ मोती परी मऊ
हिंस्र आरोळयांनी, जरी रान भरे निर्झर, पाखरे, गाती इथे
प्रखर उन्हाने, तापे रान काय परी गार छाया, कुठे भारी
संसाराच्या राणी, दु:खसुख ऐसे ठेविले आपैसे दयाला तू
कशासाठी बोल, लावला मी तूज सापडते गूज, नीट जाता

२) सारंगीवाला -

मनमोहन वाजवुनी सारंगी, काढी मंजुळ सूर
विश्व निजले, शांत झाले
मनमोहन वाजवुनी सारंगी, काढी मंजुळ सूर

एक धरणी मात्र डोले
विश्व निजले, शांत झाले
गंभीरपणाने अंधारातून छेडीत जाई सूर.

३) कृतज्ञता -

पोर खाटेवर मृत्युचाच दारा
कुणा गरीबाचा तळमळे बिचारा
दूर आई राहिली कोकणात
सेविकेचा आधार एक हात !
सुंदर हिरवे माळ !
निवली राणे, गुरे-वासरे;
निवली झाडे रानपाखरे ;
धनी अंतरी निवाले सारे;
शेतकऱ्यांच्या पोटामधला निवेल कधि पण जाळ ?

४) माझी शाळा -

तुझे जेव्हा जेव्हा सहज मजला दर्शन घडे
स्मृतींचे पूर्वीच्या फलक पुढती राहति खडे
हृदी भारावोनी गुणगुणत मी त्यात रमतो
तरंगुनी भावे विनत हृदये तुज नमतो

५) भलरी -

भल र, भल र - भलरि दादा ! भल गडि दादा !
तांबड फुटलं झुन्झुमुन्जू
सुकीर चांदनि लागली इझु
थंड वात करतुया कुजुबुजू
म्होर हात चालिव जोसात मर्दा
भलरि दादा ! भल गडि दादा !

## ८) यशवंत : यशवंत दिनकर पेंढरकर (१८९९-१९८६)



रविकिरणमंडळाने १९२३ सालापासून आधुनिक काव्याच्या दुसऱ्या कालखंडास आरंभ केला. त्या कालात यशवंतांचा विकास झाला. परंतु इतर कवींच्या सहवासात आणि वातावरणात वावरत असताही यशवंतांचे वैशिष्ट्य अबाधित राहिले. त्यांनी आपल्या काव्याने एक स्वयंसिद्ध प्रांत फुलविला आहे. 'यशवंती' या त्यांच्या पहिल्या काव्यसंग्रहापासून तो 'ओजस्विनी' या काव्यसंग्रहापर्यंत यशवंतांचे वैशिष्ट्य कायम राहिले आहे. 'माझ्या कविता' हा माझ्या सुखदु:खांचा परिपाक आहे' असे त्यांनी स्वत:च सांगितले आहे.

भोवतालच्या जीवनात खोटेपणा, दांभिकता, अरेरावी ही दिसून येईल. ही मनाची व्यापकता त्यांच्या जीवनातील अतिशय कष्टमय परिस्थितीतही व्यक्त होत होती.

१) 'अन्य नको वरदान | प्रभो मज | अन्य नको वरदान |

कोणी अवती-भवती माझ्या

जमले किंवा जमविले ज्या

पुरावायते त्यांच्या गरजा

द्या सामर्थ्य निदान !'

२) 'पाणपोई' या संग्रहात ते आपल्या रसिकवृंदास म्हणतात -

' येई भाई येथ पाही घातली ही पाणपोई

धर्म-जाती कोणती ती भेद ऐसा येथ नाही

- श्रांत पांथा ! बांधली ही तूझियासाठी सराई.
- ओंजळी, दो ओंजळी, आकंठ किंवा घे पिऊनी
हो जरा ताजातवाना, येउ दे सामर्थ्य पायी.
पावता तृप्ती मना, संचारता अंगी उमेदी
जो दुवा देशील पांथा तेवढी माझी कमाई.'

३)

'आई' म्हणोनि कोणी आईस हाक मारी
ती हाक येई कानी मज होय शोककारी
नोव्हेच हाक माते मारी कुणी कुठारी.
आई कुणा म्हणू मी आई घरी न दारी !
ही न्यूनता सुखाची चित्ता सदा विदारी
स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी - १
येशील तू घराला परतून केधवा गे ?
दवडू नको घडीला ये ! ये ! निघून वेगे !
हे गुंतले जिवाचे पायी तुझ्याच धागे ;
कर्तव्य माउलीचे करण्यास येई वेगे.
रुसणार मी न आता जरी बोलशील रागे.
ये रागवावयाही परि येई येई वेगे ! - ७

४) जग-रहाटी :

जगा ! तुझी सारी तऱ्हा सदा उफराटी !
एक तरी बागेतील
फुल कौतुके देशील
बाळगिली आशा फोल

अता पुष्पराशीमाजी बुडे मात्र ताटी ! - १
सतावून यावज्जीव
ओलांडता आता शीव,
दाखवितो प्रेमभाव
परिमार्जनाची धन्य तुझी ही रहाटी !

५) वंदन तुज मायभूमी -

वंदन तुज मायभूमि ! हे अखेरचे !
न कळे तव दर्शन कधि फिरुनी व्हायचे !
मरणाच्या दाढेमधि चाललो जरी,
मरणाच्या भीतिचा न लेशही उरी.
मरणाच्या खाईमधि आयु कंठले,
मरणाचे काय तया बुजगबाहुले ?
ग्रीष्माचा दाह काय वाळल्या तृणा ?
राखेला जाळिल का अग्नि तो पुन्हा ?
परि तुझी न भेट मला व्हायची पुढे,
ह्या शल्ये हे तुटते मात्र आतडे.
मिळणार न अंत्यशयन गे त्वदंकिचे
वंदन तुज मायभूमि ! हे अखेरचे !

काव्यसंग्रह : यशवंती, ओजस्विनी, भावमंथन, जयमंगला, बंदिशाळा. 'मोतीबाग' - बालगाण्यांचा संग्रह.

बडोदे सरकारने राजाश्रय देऊन 'राजकवी' ही पदवी दिली.

रविकिरण मंडळातले इतर कवी -

४) श्री. बा. रानडे ५) गं. त्र्यं. माडखोलकर ६) द.ल.गोखले ७) दिवाकर ८) मनोरमा रानडे

## ९) चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे (१८७१-१९३७)



चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे
जन्म २९ जानेवारी १८७१ ] [ मृत्यु १७ मार्च १९३७

रविकिरणमंडळाच्या काळापर्यंत ते काव्यलेखन करीत होते. परंतु आधुनिक काव्याच्या विशिष्टस्वरूपाशी ते अखेरपर्यंत कधीही समरस झाले नाहीत. पंडितीकाव्याची वैशिष्ट्ये, म्हणजे सर्वांना पत्करेल असा काव्यविषय, परंपरेने रूढ झालेल्या वृत्तजातीचा बिनचूक वापर, अलंकारांचा विपुल उपयोग आणि घोटीव, दिमाखदार भाषा ही होत. ती सर्व चंद्रशेखरांच्या कवितेत प्रकर्षाने आढळून येतात. त्यांनी आपल्याभोवती सरहद्दींची एक रेषा आखून घेतली होती. परंतु त्या रेषेच्या बंधनात त्यांच्या लेखणीने मिळविलेले यश मात्र विलोभनीय आहे यात शंका नाही. त्यामुळेच जुने असूनही नवीन कवींच्या व टीकाकारांच्या मेळाव्यातही ते प्रतिष्ठा मिळवू शकले. या कालखंडात इतरही अनेक कवी पंडिती पद्धतीने काव्यरचना करीत होते. प्राणु कित्येकांचे काव्य नव्याजुन्याचा मेळ घालण्याच्या क्षीण प्रयत्नांमुळे अयशस्वी झाले, तर इतरांचे काव्यगुणाच्या कमतरतेमुळे व शाब्दिक जडजंबालतेमुळे दुर्लक्षित झाले. आधुनिक काळातही जुने सूत्र घेऊन पुढे जाणारे व स्थिर होणारे प्रातिनिधिक कवी म्हणून एका चंद्रशेखरांचाच निर्देश करावा लागेल. चंद्रशेखरांचे सारे आयुष्य कारकुनी पेशात व दारिद्र्यात गेले. काव्यावरील निष्ठेमुळे त्यांनी सांसारिक सुखाची व संपत्तीची फारशी पर्वाही केली नाही. अखेरच्या काळात ते बडोद्याचे राजकवी झाले.

१) कवितारति -

" तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला,
तुझ्यास्तव न ती पदे, उपपदे, मिळाली मला;
तुझ्यास्तव हुजूरचा जरि गुलाम झालो स्वता,
तुझ्यास्तवचि गांजलो तरि निबंधाते अता.
तुझ्यास्तव न लोभता विभवमार्ग मी टाळले,
तुझ्यास्तव सखे ! मला स्वजन तेहि कंटाळले;
तुझ्यास्तवचि हलेना मम गृहवधानी घडे,

तुझ्यास्तव जनाहुनी विजन हा मला आवडे.

२) काय हो चमत्कार - (अत्यंत गाजलेली कविता)

"गोधूम वर्ण तीचा हरणाच्या पाडसापरी डोळे.
स्नेहाळ वदन नामी, प्रसन्न विधुबिंब जेवि वाटोळे.
तो केशपाश काळा भाळावरि लांब आडवे कुंकू;
जणु म्हणति शब्द तीचे आम्ही कोकिलरवासही जिंकू .
घेती पाटील साड्या हौसेच्या रेशमी किनारीच्या,
ऐनेदार खडीच्या झळकति चोळया तया कुमारीच्या,
साधीच कंकणे ती, कदा तदाकार नागमोडीचे,
शोभति शुद्ध रुप्याचे तयावरी गोल गोठ जोडीचे.

## १०) माधवानुज - काशिनाथ हरी मोडक (१८७२-१९१६)



व्यवसायाने डॉक्टर.

"कोणत्याही देशातील कवींची चरित्रे धुंडाळून पाहिली तर त्यात दैन्य व दारिद्र्य याशिवाय दुसरे काय आढळते ? मेल्यावर जे जग या कवींना डोक्यावर घेऊन नाचते, ते जिवंतपणी त्यांच्याकडे ढुंकूनही बघत नाहीत."

'सुनीत' मराठीमध्ये प्रचलित व्हावे म्हणून केशवसुतांनी जे प्रयोग केले, त्यात त्यांना माधवानुज व तांबे या दोनच प्रमुख कवींकडून प्रोत्साहन मिळाले. त्यांनी लिहिलेली सुनीते 'भगवद्गीता', 'काल, कीर्ती आणि विस्मृती' व 'जादूचा प्रभाव' ही त्यांची सुनीते हृदयंगम आहेत.

त्यांची दुष्काळावरील गाणी आणि 'स्मृतीचित्र', विसरलेले गाणे', 'माझ्या लहानपणीची बाग', 'स्मशानगीत' या कविता मनाला चटका लावतात.

माधवानुजांची दोन गाजलेली गीते -

१) कृष्णा - कोयनेचा संगम

सखेगे, सुरेख, संगम किती, कृष्णा मिळाली कोयनेप्रति

किती विशाल तट हे अहा !

प्रिय सखे उभी तू रहा

क्षण येथील शोभा पहा

सखेगे, सुरेख, संगम किती, कृष्णा मिळाली कोयनेप्रति

२) दिवाळी सण -

आली दिपवाळी, गड्यांनो, आली दिपवाळी ।
रोज रोज शाळा, पुरे ती आला कंटाळा
चार दिवस आता, मनाला कसली ना चिंता
उडू बागडू जशी पाखरे स्वैर अंतराळी.

३) विसरलेले गाणे -

दे शांती गान मनाते मधुर किती ?
दिनरजनी होतो गुंगत मी वदनी,
हतभागी गेलो विसरून त्या लागी,
वणवण मी संप्रति फिरतो वनभूमी,
गीरीकुहारी निर्झरवल्ली तरुनिकरी

## ११) 'बी' – नारायण मुरलीधर गुप्ते (१८७२-१९४८)



'Bee' या इंग्रजी टोपण नावाने ते कविता करीत असत. ते प्रमुखत: तत्ववेत्ते कवी आहेत. सामान्य विषयातही त्यांना जो माठा आशय दिसतो तो बहुश: तत्वज्ञानात्मक असतो. त्यांच्या या तत्वज्ञानाची बैठक सर्वस्वी भारतीयाच आहे. केशवसुतांप्रमाणे पश्चिमेकडून आलेल्या आधुनिक प्रज्ञावादाचे संस्कार त्यांच्यावरती झालेले दिसत नाहीत; किंवा टिळकांप्रमाणे त्यांची वृत्ती धर्मशील व भाविकही नाही. त्यांच्या मनावर पगडा दिसतो तो वेदान्त तत्वज्ञानाचा. या वृत्तीमुळेच की काय, त्यांची कविता संपूर्णत: आधुनिक असली तरी स्वत:चे व्यक्तित्व त्यांनी तिच्यापासून बव्हंशी अलिप्त ठेवले आहे. आधुनिक कवितेबद्दल व कवींबद्दल त्यांना गाढ प्रेम व आदर वाटत होता. आणि या प्रेमादरातूनच ते काव्य लेखनाकडे वळले असावेत. 'बीं'ची आविष्कार पद्धती संस्कृत प्रचुर, क्लिष्ट, बोजड व कित्येक ठिकाणी बरीचशी संदिग्ध अशी आहे. विशेषत: ते जेव्हा काही रुपकांची योजना करतात तेव्हा ती संदिग्धता अधिक जाणवते. त्यामुळे त्यांच्या कित्येक कविता वाचताना हे काहीतरी चांगले आहे, पण नक्की काय आहे ते समाजात नाही, अशी जाणत्या रसिकांची अवस्था होते. 'कमळा'सारख्या काही काव्यातून मात्र त्यांच्या शैलीचे प्रौढगंभीर परंतु प्रासादिक स्वरूप प्रकट झाले असून त्यामुळे ती रमणीय झाली आहेत. जुन्या भारतीय तत्त्वज्ञानाप्रमाणेच पुरोगामी सामाजिक विचारही त्यांनी आत्मसात केले होते याची साक्ष अनेक कवितांतून मिळते.

१ (वेडगाणे -

टला री-रीला ,ट-

जन म्हणे काव्य करणारी

आकाशाची घरे

ज्याला प्रकाशाची दारे

ग्रहमाळांच्या वर अडसरी-ग,

जन म्हणे काव्य करणारी.

२) माझी कन्या -

गाइ पाण्यावर काय म्हणुनि आल्या ?
का ग गंगायमुनाहि या मिळाल्या ?
उभय पितरांच्या चित्त चोरटीला
कोण माझ्या बोलले गोरटीला ?

३) कमळा -

नभ:शिलेवर कोर चमकते चढत्या चंद्राची
निकषावरची जशी ठळकशी रेषा सोन्याची !
कोमल आहे कोणी श्यामा चिंताकुल बसली,
लावण्याची किशोरगंगा वाट काय चुकली !

४) दीपज्योतीस -

सोन्याची तनु जाळितेस अपुली पाषाणमूर्तीपुढे,
मुग्धे ! ते वद कोण पुण्य तुझिया हातास तेणे चढे ?
सारे विश्व बुडे तमात तिकडे भांबावुनी बापुडे,
गे ! निष्कंप, तुला परंतु इकडे, ही ध्यान-मुद्रा जडे.

५) चाफा -

चाफा बोलेना, चाफा चालेना,
चाफा खंत करी, काही केल्या फुलेना.

## १२) भास्कर रामचंद्र तांबे (१८७४-१९४१)



भास्कर रामचंद्र तांबे
जन्म : २७।१०।१८७४
मृत्यु : ७।१२।१९४१

आपल्या काव्याविषयी तांबे यांनीच विस्तृत खुलासा केला आहे. ते म्हणतात : "माझ्या कवितेची वाढ माझ्या जीवनाच्या संगतीने झाली आहे. माझ्या कवितांचा आधार येथून तेथपावेतो समाजाच्या अंतर्बाह्य अवलोकनावर आहे"

वयाच्या ४६ व्या वर्षांपर्यंत कवी म्हणून त्यांची फार थोड्या लोकांना माहिती होती ! त्यांनी काव्य लेखनास आरंभ केला. तीस वर्षे त्यांचे काव्य वाचकांपुढे फारसे आले नाही.

प्रसिद्धीची हौस तर दूरच परंतु अगदी स्पष्ट नावड असल्याने भास्करराव यांच्या काव्याचा परिचय मराठी वाचकास फार उशिरा झाला. त्यांनी काव्य लिहिण्यास १८९० पासून म्हणजे वयाच्या १६व्या वर्षीच सुरुवात केली होती.

त्यांच्या कविता राग-तालात रचलेल्या असल्याने त्यांना गेयता प्राप्त झाली. मराठी काव्य प्रांतात हा एक नावच प्रकार तांबे यांच्यापासून सुरु झाला. १९२० साली तांबे अभिनव व आकर्षक स्वरुपात महाराष्ट्र-काव्योद्यानात आकस्मिकपणे प्रगत झाले. आता ते त्या काव्याने असंख्य रसिकांच्या अंत:करणात वावरत आहेत.

आधुनिक मराठीतील गीतकाव्याचे प्रवर्तक मानण्यात येते.

त्यांच्या काही प्रसिद्ध कविता

१) अजुनि लागलेचि दार

२) कशी काळ नागिणी

३) कळा ज्या लागल्या जीवा

४) कुणि कोडे माझे उकलिल का

५) घट तिचा रिकामा

६) घन तमीं शुक्र बघ

७) चरणि तुझिया मज देई

८) जन पळभर म्हणतील हाय हाय

९) डोळे हे जुलमि गडे

१०) तिनी सांजा सखे मिळाल्या

११) तुझ्या गळा माझ्या गळा

१२) ते दूध तुझ्या त्या

१३) नववधू प्रिया मी बावरतें

१४) निजल्या तान्ह्यावरी माउली

१५) पिवळे तांबुस ऊन कोवळे

१६) भाग्य उजळले तुझे

१७) मधु मागशी माझ्या

१८) मावळत्या दिनकरा

१९) या बाळांनो या रे या

२०) रे हिंदबांधवा थांब

१) निजल्या तान्ह्यावरी माउली दृष्टि सारखी धरी
तिचा कलीजा पदरीं निजला
जिवापलीकडे जपे त्याजला
कुरवाळुनि चिमण्या राजाला चुंबी वरचेवरीं

२) कळा ज्या लागल्या जीवा, मला कीं ईश्वरा ठाव्या !
कुणाला काय हो त्यांचें ? कुणाला काय सांगाव्या ?

उरीं या हात ठेवोनी उरींचा शूल का जाई ?

समुद्रीं चौंकडे पाणी, पिण्याला थेंबही नाही

जनांच्या कोरड्या गप्पा, असे सारे जगद्बंधू !

हमामा गर्जनेचा हो, न नेत्रीं एकही बिंदू

३) मावळत्या दिनकरा अर्घ्य तुज जोडुनि दोन्ही करां !
जो तो वंदन करी उगवत्या जो तो पाठ फिरवि मावळत्या
रीत जगाची ही रे सवित्या ! स्वार्थपरायणपरा.

४) पिवळे तांबुस ऊन कोवळे पसरे चौफेर
ओढा नेई सोने वाटे वाहुनिया दूर.
झाडांनी किती मुकुट घातले डोकीस सोनेरी
कुरणावर शेतात पसरला गुलाल चौफेरी !

५) जन पळभर म्हणतिल, 'हाय हाय !'

मी जातां राहिल कार्य काय ?

सूर्य तळपतिल, चंद्र झळकतिल;

तारे अपुला क्रम आचरतिल,

असेच वारे पुढे वाहतिल,

होईल कांहि का अंतराय ?

६) मधु मागशि माझ्या सख्या, परि

मधुघटचि रिकामे पडति घरी !

आजवरी कमळाच्या द्रोणीं
मधू पाजिला तुला भरोनी,
सेवा ही पूर्विची स्मरोनी
करिं न रोष सख्या, दया करीं.

## १३) गोविंद : गोविंद त्र्यंबक दरेकर (१८७४-१९२६)

बालपणी शालेय शिक्षणाचे संस्कार त्यांच्यावर मुळीच झाले नाहीत असे म्हंटले तरी चालेल. परंतु त्यांची प्रतिभा जन्मसिध्द आणि प्रभावी होती. शिक्षणाचे अत्यल्प संस्कार असतानाही गुणसंपन्न साहित्य निर्माण केल्याचे उदाहरण गोविदांशिवाय फक्त एकाच दिसते. ते म्हणजे लक्ष्मीबाई टिळकांचे होय. गोविंद प्रथमत: तमाशासाठी लावण्या लिहित. पुढे सावरकर प्रभृतींच्या सहवासात त्यांच्या मनाने व प्रतिभेने वेगळे वळण घेतले. स्वातंत्र्यशाहीर ही पदवी महाराष्ट्रकवींत कोणाला यथार्थतेने लावता येत असेल तर ती गोविंदांनाच होय. पारतंत्र्याचा जळजळीत द्वेष आणि स्वातंत्र्याची अदम्य आकांक्षा हे विशेष त्यांच्या काव्यात अत्यंत उत्कटतेने प्रकट झाले आहेत. स्वातंत्र्याची इतकी प्रखर उपासना अन्य कोणत्याही कवीने केली नाही. स्वातंत्र्यासाठी सतीचे वाण पत्करणाऱ्या तरुणाच्या सहवासात ते होते. त्यामुळे त्यांची कविता कर्मशीलतेतून स्फुरण पावलेली आणि कर्मशीलतेला प्रेरणा देणारी अशी होती. गोदावरीच्या तीरावर वावरलेल्या या अपंग कवीच्या काव्यातील स्वातंत्र्यभावना नुसती अधिक जळजळीत होती असे नाही, तर अधिक विधायकही होती.

१) सुंदर मी होणार ! -

सुंदर मी होणार! आता सुंदर मी होणार ,
सुंदर मी होणार । हो । मरणाने जगणार ॥
वर्षत्रय मम देह मरतसे, तो आता मरणार
वर्षत्रय मम प्राण जातसे, तो आता जाणार ॥
आनंदी आनंद जाहला, तनु क्रांती होणार !
मरणाचा परमेश्वर मजवर करुणाघन वळणार !
आनंदी आनंद जाहला, मारता मी हसणार;
हासत मरणे गोविंदाचा प्रेमपंथ ठरणार !

२) सरस्वतीची भूपाळी -

नामाने वाहुनि स्तवने उधळा, जयजयकार करा,
बंधुहो । जयजयकार करा

सकल मनांचा विकास येतो आज आपुल्या घरा ॥

हे वाग्देवी, असे प्रार्थना  ये या संकीर्तना,

उत्सवा । ये या संकीर्तना,

जगन्मंगले, सकाळ मंगलासह दे पददर्शना ॥

सौंदर्याहुनि दिव्य दिव्यतर हिचे ज्ञान सुंदर,

खरोखर । हिचे ज्ञान सुंदर,

त्या ज्ञानाहुन जगात सुंदर एकाच परमेश्वर ॥

## १४) दत्त - दत्तात्रय कोंडो घाटे (१८७५-१८९९)



अल्पवयात मरण पावलेल्या या कवीची (अवघे २४ वर्षे) कविता स्वाभाविकपणेच फार थोडी आहे. परंतु जी आहे ती मात्र फार गुणशाली व पृथगात्म आहे. त्यांची भाषाशैली इतर समकालीनांहून अधिक प्रसन्न व लालित्यपूर्ण आहे. कोमल भावना, रसिक वृत्ती आणि तरल कल्पनाशक्ती ही त्यांची वैशिष्ट्ये होत. ' निज निज माझ्या बाळा ' व 'फुले विकणारी पोर ' यांच्यासारख्या कवितातून प्रकट झालेली त्यांची सामाजिकता फार हृदयंगम आहे. त्यात आवेश किंवा तत्वघोष नाही, परंतु समाजरचनेतील अन्यायाचे कारुण्य वाचकांच्या अंत:करणात बिंबविण्याचे सामर्थ्य त्यात खचित आहे.त्यांची प्रेमकविता सरळ व काहीशी रंगेल आहे. निसर्गाविषयीची जी रसज्ञ व लालित्यरम्य वृत्ती पुढे बालकवींमध्ये शिगेला पोहोचली, तिचे पहिले सुंदर दर्शन दत्तांच्या कवितेतच होते.

१) निज नीज माझ्या बाळा - ( एक अत्यंत गाजलेली कविता)

बा नीज गडे नीज गडे लडिवाळा !

निज नीज माझ्या बाळा !

रवि गेला रे सोडूनी आकाशाला,

धन जैसे दुर्भाग्याला.

अंधार वसे चोहीकडे गगनात,

गरिबांच्या जेवि मनात.

बघ थकुनी कसा निजला हा इहलोक,

मम आशा जेवि अनेक.
खडबड हे उंदिर करिती,
कण शोधायाते फिरती,
परि अंती निराश होती;
लवकरि हेही सोडितील सदनाला,
गणगोत जसे आपणाला.

२) नवे पान उघडले !

जन्मापासुन पाहिली वरवरी तेवीस पाने पुरी;
कोण माहित आणखी किती तरी पाहीन या भूवरी ?
दृष्टीदेखत आज पान सरले, आले नवे बाहिर;
जाणू काय अम्ही शुभाशुभ किती वाचील तो यावर ?

३) विश्वामित्रीच्या काठी -

शशिरायाही आत उतरला,
कलहंसापरि पोहु लागला;
तटिनीने जणु हृदयी धरिला;
प्रेमळ कान्त -
पाहुनी इथे एकांत !
वरती खाली दिसते गगन;
मध्ये लंबित अपुले भवन;
वातावरणी आधाराविण
गोजिरवाणी -
फेकिला चेंडु हा कोणी !

## १५) बहिणाबाई चौधरी (१८८०-१९५१)



" प्रतिभा हे कवीला निसर्गाचे देणे आहे. ते त्याच्याबरोबरच यावे लागते. यत्नाचा किंवा विद्येचा त्याच्याशी काही संबंध नाही, हे माझे आता ठाम मत झाले आहे. कोकिळेने तोंड उघडले की आपोआप संगीत वाहू लागते. प्राजक्ताची कळी उमलली की ती सुगंधाचेच नि:श्वास टाकू लागते. तसे जातीच्या कवीचे आहे. त्याचे हृद्यच ताल धरून बसलेले असते. त्यामुळे त्याच्या जिभेवर शब्द जो येतो तो मुळी नाचतच येतो. सृष्टीचे सौंदर्य तेवढे त्याच्या डोळयाला दिसते. आणि जीवनातले संगीत त्याला ऐकू येते. डोंगराच्या कपारीआडून जसा एखादा झरा उचंबळत असतो, तसे काव्य एकसारखे त्याच्या हृदयातून उसळया घेत असते."

" ज्या काळात केशवसुत, विनायक, तांबे, 'बी' किंवा गोविंदाग्रज हे महाराष्ट्राचे प्रतिभाशाली कवी आपल्या काव्याचा बहार महाराष्ट्रावर उधळीत होते, त्याच काळामध्ये जळगावात राहणाऱ्या एका शेतकऱ्याच्या घरात एक अडाणी मराठी गृहिणी जात्यावर दळता दळता किंवा शेतामध्ये काम करता करता आपल्या खेडवळ भाषेत 'संसाराची गाणी' गात होती. या गाण्यामध्ये जातिवंत जिव्हाळयाचे आणि अलौकिक प्रतिभेचे काव्य प्रगत होत होते. ह्याची वर्षानुवर्षे कोणाला जाणीव नव्हती. "मानसा, मानसा, कधी व्हशील मानूस !" ह्या मानवतेला त्यांनी दिलेल्या अमर संदेशाने तर मराठी वाड़मयात त्यांचे स्थान अढळच करून ठेवले आहे ! " - आचार्य अत्रे.

१) कशाला काय म्हनू नही -

बिना कपाशीन उले    त्याले बोंड म्हनू नही
हरी नामाईना बोले    त्याले तोंड म्हनू नही
निजवते भुक्या पोटी    तिले रात म्हनू नही
आखडला दानासाठी    त्याले हात म्हनू नही
इमानाले इसरला    त्याले नेक म्हनू नही

जन्मदात्याले भोवला   त्याले लेक म्हनू नही

२) संसार -

अरे संसार संसार       जसा तवा चुल्ह्यावर
आधी हाताले चटके   ! तवा मियते भाकर
ऐका, संसार संसार    दोन्ही जीवाचा इचार
देतो दु:खाले होकार   अन् सुखाले नकार

३) मन -

मन वढाय वढाय       उभ्या पिकातलं ढोर
किती हाकला हाकला          फिरी येतं पिकांवर
मन पाखरू पाखरू    त्याची काय सांगू मात ?
आता व्हतं भुईवर      गेलं गेलं आभायात

४) देव अजब गारोडी -

धरत्रीच्या कुशीमधी   बीयबियान निजली
वऱ्हे पसरली माटी    जशी शाल पांघरली
बीय टरारे भुईत       सर्वे कोंब आले वऱ्हे
गह्यरलं शेत जसं       आंगावरती शहारे

५) खोप्यामधी खोपा -

अरे खोप्यामधी खोपा          सुगरणीचा चांगला
देखा पिलासाठी तिनं झोका झाडाले टांगला
पिलं निजले खोप्यात  जसा झुलता बंगला
तिचा पिलामधी जीव          जीव झाडाले टांगला

## १६) स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर - (१८८३-१९६६)



सावरकरांच्या काव्यात वीररस, देशभक्ती, कल्पनेचे भव्यत्व, विचारप्रधानता, तरल भावुकता इत्यादी दर्शन घडते. सागरास(ने मजसि ने...), माझे मृत्यूपत्र,  गोमंतक अशा कविता प्रसिद्ध आहेत. जयोस्तुते हे स्वातंत्र्यदेवतेचे गीत यांवरूनही स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या स्फूर्तिदायी काव्यप्रतिभेची जाणीव आपल्याला होते.

सागरास -

ने मजसी ने परत मातृभूमीला
सागरा प्राण तळमळला ||धृ.||
भूमातेच्या चरणतला तू धूता,
मी नित्य पाहिला होता;
मज वदलासी अन्य देशी चाल जाऊ;
सृष्टीची विविधता पाहू,
तैं जननीहृद विरहशंकितचि झाले
परि तुवां वचन तिज दिधले,
मार्गज्ञ स्वये मीच पृष्ठी वाहीन.
त्वरित या परत आणीन !
गंभीर त्वदाकृति बघुनी, मी,
विश्वसलो या तव वचनी, मी,
जगदनुभवयोगे बनुनी, मी,
'येईन त्वरे' कथुनि सोडिले तिजला,
सागरा, प्राण तळमळला !

माझे मृत्युपत्र -

की घेतले व्रत न हे अम्हि अंधतेने
लब्ध प्रकाश इतिहास-निसर्ग-माने
जे दिव्य, दाहक म्हणुनि असावयाचे
बुध्याचि वाण धरिले करि हे सतीचे
(शेवटचे कडवे)

## १७) केशवकुमार : प्रल्हाद केशव अत्रे (१८९८-१९६९)




ज्या काळात मी कविता लिहू लागलो तो 'नवीन कविते'च्या वैभवाचा काळ होता. केशवसुतांच्या 'तुतारी'च्या ललकाऱ्या त्या वेळी वातावरणामध्ये एकसारख्या उचंबळत होत्या. बालकवींच्या प्रतिभेचा 'अरुण' महाराष्ट्राच्या क्षितिजावर नुकताच उगवलेला होता. 'पंचप्राणाचा पंचम' लावून गोविंदाग्रज कोकिळांच्या उन्मादाने प्रेमाची रागदारी आळवीत होते. 'बी' कवींच्या चौघड्याने नि तांबे कवींच्या सनईने शारदेच्या मंदिरात माधुर्याबरोबर एकप्रकारचे मांगल्यही निर्माण झाले होते. नवकवितेची एक विलक्षण धुंदी आमच्या डोळ्यावर त्या वेळी चढली होती. या धुंदीमधून आम्हाला वीसएकवीस साली पुण्याच्या 'रविकिरण मंडळा'ने जागे केले. नुसते जागे केले नाही तर गार पाण्याची बादली घेऊन ती आमच्या डोक्यावर त्या मंडळाने अक्षरश: भडाभडा ओतली. त्याचा परिणाम दुसऱ्या कोणावर काय झाला, हे काही मी सांगू शकत नाही. पण माझ्या स्वत:वर तरी असा झाला की, भावकाव्याचे गंभीर अवगुंठन झुगारून देऊन माझ्यामधला व्रात्य विडंबनकार डुरकाळी फोडून एकदम बाहेर पडला. माझ्या प्रतिभेला आलेली 'दुपारची फुले' एकदम गळून पडली. आणि तिच्यावर सरासरा 'झेंडूची फुले' फुलून आली. 'रविकिरण मंडळ' जर प्रकट झाले नसते तर माझ्या बुद्धीच्या खोल कपारीआडून विनोदाचा चांगला मनगटाएवढा झरा वाहतो आहे याचा मुळीच सुगावा लागला नसता, हे अगदी खरे आहे!

विडंबित कवींची टर उडवावी किंवा त्यांची फटफजिती करून त्यांना कवितेच्या क्षेत्रातून उठवून लावावे असा काही 'झेंडूची फुले' लिहिण्यात माझा हेतू नव्हता. सदर कवींच्या

काव्यातले मला वाटणारे दोष हसत हसत आणि गमतीजमतीने त्यांच्या आणि वाचकांच्या निदर्शनाला आणावे आणि वान्मायात एक नवी मौज निर्माण करावी, एवढाच माझा उद्देश होता. सामान्य वाचकांच्या आणि श्रोत्यांच्या दृष्टीने तो माझा हेतू अपेक्षेपक्षा यशस्वी झाला. पण विडंबित कवींची मने न दुखावली जाण्याच्या बाबतीत मात्र मला तितकेसे यश आले नाही. काही कविमित्र माझ्यावर अतिशय रागावले आणि काहीना मनापासून वाईट वाटले.

'विडंबन' या शब्दाचा अर्थ 'हास्यास्पद नक्कल करणे' किंवा 'वेडावण्या दाखवणे' असा होत असल्याने आणि 'विडंबन'चे 'विटंबने'शी अधिक साम्य असल्यामुळे सदर वाङमय प्रकार हा अनिष्ट आहे असा सामान्य माणसाच्या मनावर एक संस्कार होत असतो. तो मात्र बरोबर नव्हे, असे मला या ठिकाणी आग्रहाने सांगावयाचे आहे. 'विडंबन' ही संभावित साहित्यिकांनी करण्यासारखी गोष्ट नाही, असाही त्या नावावरून एक ध्वनी सूचित होतो., तोही भ्रामक आहे. कारण विडंबन हा विरोधी भक्तीचा एक प्रकार आहे. ज्या काव्याचे विडंबन करायचे किंवा ज्या कवीचे विडंबन करायचे ते काव्य आणि तो कवी लोकप्रिय असायला हवा. तरच त्याच्या विडंबनाचा आस्वाद वाचकांना घेता येईल. मूळ काव्य जितके प्रसिद्ध तितकी त्याच्या विडंबनाची गोडी अधिक. लुंग्यासुंग्या कवींचे किंवा काव्याचे विडंबन मुळी होऊच शकत नाही. आणि झाले तर ते वाचणार कोण आणि समजणार कोणाला ? 'रविकिरण मंडळा'तले कवी जर फाटके तुटके असते आणि त्यांच्या काव्यात गुणाचा लवलेश नसता, तर 'झेंडूच्या फुलां'ना महाराष्ट्रात जी अपरंपार लोकप्रियता लाभली, ती मुळी लाभालीच नसती. एखाद्या कवीचे विडंबन करणे म्हणजे त्याबद्दल अप्रत्यक्षपणे आदर व्यक्त करण्यासारखेच आहे. विडंबन काव्याचे हे स्वरूप एकदा लक्षात आले म्हणजे विडंबनकाराबद्दल कोणाचाही गैरसमज होणार नाही. – वाचकांचा नाही आणि विडंबितांचाही पण नाही ! उलट विडंबनकार हा पुष्कळांना आपला उपकारकर्ताच आहे असे वाटेल !

- आचार्य प्र.के.अत्रे (प्रस्तावना 'झेंडूची फुले')

१) चाफा - (सुप्रसिद्ध Bee कवींच्या 'चाफा' ह्या हृदयंगम कवितेच्या चालीची व पालुपदाची थोड्याशा बदलाने सदर कवितेत उसनवारी केली असली तरी यापलीकडे त्या थोर कवितेची कोठल्याही तऱ्हेने बदनामी करण्याचा प्रस्तुत कवितेत प्रयत्न केलेला नाही)

चाफा बोलेना । चाफा चालेना
चाफा खंत करी । कोणी त्यासी पुसेना !

गेला फुलांच्या ग वनी । सारा शिणगार लेवुनी,
बसला डोके उंचावूनी । कोणी त्यासी बधेना ॥
सुकुनी झाली चोळामोळा । फुले ती करी बाजूची गोळा,
चुकवूनी मग इतराचा डोळा । डकवी आपुल्या पाना ?

२) मनाचे श्लोक -

मना, नीट पथे कधीही न जावे,
निशापाणि केल्याप्रमाणे चालावे,
जरी वाहने मागुनी कैक येती
कधी ना तरी सोडिजे शांतवृत्ती ।
मना सज्जना, चार आण्यात फक्त
तुला व्हावयाचे असे 'देशभक्त' !
तरी सांगतो शेवटी युक्ती सोपी,
खिशामाजि ठेवी सदा गांधिटोपी !

३) वाहवा, वाहवा, नेहरू हा !

वाहवा, वाहवा, नेहरू हा
सुंदर कितीतरि खचित अहा !
तर तो आपण पाहू या,
त्याला जाऊनि सांगू या;
नेहरूकाका,
मुंबई टाका
आई आहे अमुची
नाही कुणाच्या बापाची !

४) मंत्री हा जुल्मि गडे -

मंत्री हा जुल्मि गडे, यास पुन्हा निवडू नका
छळितो हा फार तुम्हा, यास मत देउ नका ॥
साधूचा आव जनी
सत्तेची हव मनी
मागिल दारी घुसुनी
खातो हा भाव फुका !

५) परिटास -

परिटा येशील कधी परतून
कोट रेशमी लग्नामधला मानेवर उसवून !
उरल्या सुरल्या गुंड्यांचीही वासलात लावून !
बारिकसारिक हातरुमाला हातोहात उडवून !
सदऱ्यांची या इस्तरिने तव चाळण पार करून !

## १८) अनिल : आत्माराम रावजी देशपांडे (१९०१-१९८२)



पुण्यासारख्या सनातनी वातावरणात फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिकत असताना अनिलांनी प्रेमसाधना केली आणि निर्माण झालेल्या सामाजिक विरोधापुढे न डगमगता खंबीरपणे आणि शांतपणे आपले ध्येय साध्या करून दाखवले. अनिलांचा हा आंतरजातीय प्रेमविवाह होता.

दोघेही पतीपत्नी कवी होते. त्यांच्या पहिल्या कवितासंग्रहाचे नाव त्यांनी 'फुलवात' असे ठेवले. कुसुमावती = फुल, अनिल = वात !

'काव्य म्हणजे संगीतगर्भ विचार' अशी अनिलांनी काव्याची व्याख्या केली आहे.

त्यांची पुस्तके 'फुलवत', 'पेर्तेव्हा',

अनिलांच्या 'चिरयौवन' या संग्रहाच्या परिशिष्टात मुक्तछंदाविषयी माहिती आली आहे.

" मुक्तछंद -

मुक्तछंद तालाची आवश्यकता मानीत नाही हा निष्कारण गैरसमज आहे. छंदास तालाचे बंधन आवश्यक नाही ही मुक्तछंदाची भूमिका नाही; कधीही नव्हती. तालबद्ध अक्षररचना म्हणजेच छंद ही छंदाची व्याख्या पूर्णपणे मान्य करूनच मुक्तछंदाचा प्रयोग केला गेला आहे. हा प्रयोग करणारांना तालाच्या काव्यातील कार्याची पूर्ण ओळखही आहे. मुक्तछंदाची बंडखोरी तालाविरुद्ध नाही, तर तालावर बद्धछंदात जी पोलादी चौकट बसविण्यात येते तिज विरुद्ध आहे. छंदाच्या प्रत्येक ओळीची लांबी ठराविक असली पाहिजे; तीत तालाची नियमित आवर्तने आली पाहिजेत; त्यात दोन, तीन व चार अशा नियोजित ओळी असल्या पाहिजेत. ही छंदाची स्वाभाविक बंधने नव्हेत. ह्या गोष्टी म्हणजे छंदावर लादलेली

पोलादी चौकट.  ह्या चौकटीतून छंदास मुक्त करणे हेच मुक्तछंदाचे उद्दिष्ट. छंदावर लादलेल्या पोलादी चौकटीतून मुक्त झालेला छंद तो मुक्तछंद."

"अनिलांनी मुक्तछंदाचे प्रवर्तन केले तरी ह्या मुक्तछंदातून व्यक्त होणारा विचार आक्रस्ताळी स्वरूपाचा नाही. आक्रस्ताळेपणा, ऊरबडवेपणा हा अनिलांच्या कवितेत कुठे बसत नाही. त्यांच्या कवितेचे बहिरंग हे संथ लयीत सामावणारे आहे. त्यामुळे खोटा, ऊरबडवा आवेश त्यांच्या कवितेत कुठे येत नाही. अन्यायाविरुद्ध व्यक्त होणारी चीडही कुठे मुठी आवळून जल्लोष करीत नाही. त्यांच्या मनातला संताप हा संयत, समघात, शांत अशा सुसंकृत मनाचा संताप असतो, आणि तो तसाच व्यक्तही होतो.'प्रेम आणि जीवन'मध्ये एकीकडे आत्महत्येमुळे अस्वस्थ झालेला कवी आहे तर दुसरीकडे त्या अस्वस्थतेवर मात करण्यासाठी स्वत:ची जीवन निष्ठा आविष्कृत करण्याचा बाणा आहे."

"मी थोड्याच कविता लिहिल्या तर कुठे काय थोडे झाले ?

इतक्या लिहिल्या गेल्या हातून हेच काय थोडे झाले.'

१) सारंग -

वेळ झाली भर मध्यान्ह        माथ्यावर तळपे ऊन

नको जाऊ कोमेजून             माझ्या प्रीतीच्या फुला रे

२) सायंतारा -

गगनि उगवला सायंतारा             मंद सुशीतल वारा

हाक तुझी मज स्पष्ट ऐकू ये    येइ सखे, ये बैस जवळि, ये

घाल गळा मम तव कर कोमल        पसरू दे श्वासाचा परिमल

घेई मम हृदयात निवारा             गगनी उगवला सायंतारा

३) आळवणी -

थकले रे डोळे माझे    वाट तुझी पाहता

वाट तुझी पाहता रे    रात्रंदिन जगता

४) झळ -

केळीचे सुकले बाग    असुनिया पाणी
कोमेजलि कवळी पानं  असुनि निगराणी
अशि कुठे लागली आग जळति जसे वारे
कुठे तरी पेटला वणवा  भडके वन सारे

५) मानवता -

अन्याय घडो कोठेही  चिडून उठू आम्ही
घाव पडो कोठेही     तडफडू आम्ही
हाल पाहून हळहळू   होवोत कोठेही
पिळवणूक पाडील पीळ आम्हा  असो कोणाचीही

६) रुसवा -

अजुनी रुसून आहे खुलता कळी खुले ना
मिटले तसेच ओठ की पाकळी हले ना !
रुसवा असा कसा हा ज्या आपले कळेना
अजुनी रुसून आहे खुलता कळी खुलेना !

## १९) अनंत (आत्माराम) काणेकर : (१९०५-१९८०)



काणेकरांचा 'चांदरात' हा कविता संग्रह प्रसिद्ध झाला १९३३ साली.

या संग्रहाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत काणेकर म्हणतात, " 'चांदरात' हे माझे पहिलेच पुस्तक; आणि या पहिल्याच पुस्तकाने मला विलक्षण लोकप्रियता मिळवून दिली.' 'चांदरातीच्या' पहिल्या आवृत्तीत अवघ्या ४८ कविता होत्या. परंतु या चिमुकल्या संग्रहाच्या वेगवेगळया पैलूंनी वेगवेगळया प्रकारचे वाचक आकर्षित झाले.

काणेकरांना ही जी लोकप्रियता मिळाली ती देखील एकदम एका रात्रीत मिळावी तशी मिळाली. याचे कारण 'चांदरात' या संग्रहाला नवीनता, आधुनिकता, अकृत्रिमता आणि असांकेतिकता यातून निर्माण झालेले आकर्षक देखणेपण प्राप्त झाले होते.

त्यांनी प्रेमकविता, विनोदी कविता तसेच विडंबन कविता हे तीनही प्रकार यशस्वीरित्या हाताळले.

काणेकरांचे अत्यंत गाजलेले गीत म्हणजे 'आता कशाला उद्याची बात हे चित्रपट गीत.

१) आता कशाला उद्याची बात
बघ उडुनी चालली रात !
भरभरुनि पिऊरसरंग नऊ ,
चल बुडुनि जाऊ रंगात

२) नळावर तणतणून भांडणाऱ्या एका बाईस

बाई ही रणरंगाची खाणी, धुणाऱ्या बायांची ही राणी |

लागली भांडण्या सहज मांजरावाणी |
शिव्या दे अस्सल शुद्ध मराठी; | जमवी किती ही लोकांची दाटी !
पडसाद अजुनी घुमती चाळीपाठी.

३) कोळ्याचे गाणे -

आला खुशीत् समिंदर, त्याला नाही धिर
होडीला देईना ठरू,
ग सजणे, होडीला बघतो धरू !

४) ' चौकोनी आकाश ' -

आहे अनंत निळे आकाश
आणि अनंत आहेत तारे;
ठावूक सारे
चौकटीत परी माझ्या खिडकीच्या
कोंडलेले हे चौकोनी आकाश
आणि त्यातले चारपाच तारे
मजला प्यारे .

## २०) सोपानदेव चौधरी (१९०७-१९८२)

"कवी म्हणून मी महाराष्ट्राला परिचित झालो तो माझ्या शालेय जीवनात लिहिलेल्या कवितांनी. त्या कविता 'काव्य केतकी' म्हणून पुस्तक रूपाने प्रसिद्ध झाल्या. हा माझा पहिलावहिला कवितासंग्रह होता. यानेच मला अमाप प्रसिद्धी दिली. त्यानंतर 'अनुपमा' हा माझा दुसरा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला; पुढे ज्या कविता लिहिल्या गेल्या तो तिसरा काव्यसंग्रह काढावे असे मानत आले, परंतु ते मनातल्या मनातच राहिले; प्रत्यक्षात उतरले नाही. उभ्या महाराष्ट्रात आणि जिथे मराठी भाषा बोलली जाते अशा परप्रांतीय शहरात माझे काव्यगायनाचे हजारोनी कार्यक्रम झाले." - सोपानदेव चौधरी.

१) आणि आम्ही -

वृक्षावरून फळ खाली पडले
न्युटनचे मन खालीवर झाले
त्यातच गुरुत्वाकर्षण घडले !
आम्ही काय केले असते ?
पडत्या फळाची आज्ञा समजून
ते फळच केले असते गट्ट
अगदी गुरुप्रसाद म्हणून !
त्यांचा संचार अंतराळात
दृष्टी अंतर्गोलपटावर
आणि आम्ही मात्र उभे
या पृथ्वीच्या सालपटावर !
सर्व प्रमुख शोधांचे धनी
पाश्चिमात्य विज्ञानयोगी
आम्ही फक्त उपभोगी
ते यंत्रकार, आम्ही दुरुस्तीकर
संशोधक निर्माते सारे तिऱ्हाईत

आम्ही राहिलो फक्त गिर्हाईक !

२) यंव रे शिकार ! (ही त्यांची खूप गाजलेली कविता. कार्यक्रमात हमखास सादर करीत असत)

एकदाच हिंडता हिंडता गेलो होतो शिकारीस मी
एक हरण दिसत सामोरी धरली बंदूक नामी
नेम धरला तो असा की काय सांगू राव तुम्हा
बंदूक पुढे अन डोळा मागे !
...
जीवानिशी तर हरीण सुटले कुठेतरी झुडुपात दडे
बघता बघता आणि नेमकी गोळी ये अमुचेकडे
राहिली बंदुक जागी काय सांगू कर्म आता
आम्ही पुढे अन गोळी मागे ! आम्ही पुढे अन गोळी मागे !

या पुढील भागात :

१) ग.ल. (गजानन लक्ष्मण) ठोकळ

२) ना. घ. (नागोजीराव घनश्याम) देशपांडे

३) पु. शि. (पुरुषोत्तम शिवराम) रेगे

४) बा. सी. (बाळ सीताराम) मर्ढेकर

५) मनमोहन : गोपाळ नरहर नातू

६) कुसुमाग्रज : विष्णू वामन शिरवाडकर

७) राजा बढे

८) वा. रा. (वामन रामचंद्र) कांत

९) पद्मा : पद्मा विष्णु गोळे

१०) इंदिरा : इंदिरा नारायण संत

११) संजीवनी : संजीवनी रामचंद्र मराठे

१२) विंदा : गोविंद विनायक करंदीकर

१३) वसंत (विश्वनाथ वामन) बापट

१४) मंगेश पाडगावकर

१५) ग. दि. माडगूळकर

१६) कृ. ब. (कृष्ण बळवंत) निकुंब

१७) शान्ता ज. शेळके

१८) नारायण (गंगाराम) सुर्वे

१९) आरती प्रभू : चिंतामणी त्र्यंबक खानोलकर

२०) सुरेश (श्रीधर) भट

# ई साहित्य प्रतिष्ठान

मराठी पुस्तक वाचायला कुठे जायची गरज नाही. तुमच्या मोबाईलवर आता हजार मराठी ई पुस्तके आहेत.

मराठी ई पुस्तकं तुम्ही www. esahity. com वरून डाऊनलोड करा. किंवा esahity@gmail.com ला कळवून मेल ने मिळवा. किंवा 7710980841 हा नंबर सेव्ह करून या नंबर ला तुमचे नांव व गांव Whatsapp करून पुस्तके whatsapp मार्गे मिळवा. किंवा ई साहित्यचे app. https://play. google. com/store/apps/details?id=com. esahity. www. esahitybooks या लिंकवर उपलब्ध आहे. ते download करा. हे सर्व मोफ़त आहे. No terms. No Conditions.

आता ठरवलंय. मराठी पुस्तकांनी अवघं विश्व व्यापून टाकू. प्रत्येक मराठी सुशिक्षिताच्या मोबाईलमध्ये किमान पन्नास मराठी पुस्तकं असलीच पाहिजेत. प्रत्येक मराठी माणसाच्या!

तुमची साथ असेल तर सहज शक्य आहे हे... कृपया जास्तीत जास्त लोकांना यात सामिल करून घ्या.

आपले नम्र

टीम ई साहित्य

